सन २००४-०५ पासून शासकीय/अशासकीय अनुदानित व कायम विना अनुदानित अध्यापक महाविद्यालयात (बी.एड.) केंद्रीभूत प्रवेश पध्दतीने सामायिक प्रवेश परीक्षा (CET)लागू करणे.

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**

शासन निर्णय क्रमांक एनजीसी २००४/(४१ /०४)/मशि-३,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १६ फेब्रुवारी, २००४.

संदर्भ : १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एसटीसी १०९९/ बी.एड. प्रवेश/(१४/९९)/मशि-३, दिनांक १९ जानेवारी, १९९९.
२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एसटीसी १०९९/ बी.एड. प्रवेश/(१४/९९)/मशि-३, दिनांक २२ मार्च, २०००.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एसटीसी १००१/ बी.एड. प्रवेश/(२४/२००१)/मशि-३, दिनांक ३० जानेवारी, २००१.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एसटीसी २००२/ (१८/०२)/मशि-३, दिनांक २६ फेब्रुवारी, २००२.
५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एनजीसी-२००१/ बी.एड./(४४२/०१)/मशि-३, दिनांक २४ मे, २००२.
६) शासन पत्र क्र. मविसं-२००२/(१६२/०२)/मशि-३, दिनांक १६ एप्रिल, २००३.
७) शासन पत्र क्र. एनजीसी २०००/बी.एड./(४३३/०३)/मशि-३, दिनांक ६ नोव्हेंबर, २००३.
८) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. यूएसजी-२००३/ (३३/०३)२/विशि-४, दिनांक १६ एप्रिल, २००३.
९) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्रमांक एसटीसी २००३/ बी.एड. प्रवेश/(११०/०३)/मशि-३, दिनांक ७ मे, २००३.

पार्श्वभूमी : मा. सर्वोच्च न्यायालयाच्या ११ न्यायाधीशांच्या घटनापीठाने दिनांक ३१.१०.२००२ रोजी टी. एम. ए. पै फौंडेशन व इतर विरुध्द कर्नाटक राज्य व इतर या प्रकरणी याचिका क्र. ३१७/१९९२ व इतर व पाच न्यायाधीशांच्या खंडपीठाने दिनांक १४.८.२००३ रोजी दिलेल्या न्यायालयीन आदेशानुसार व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमांचे प्रवेश गुणवत्तेवर व पारदर्शकतेने होण्यासाठी सन २००४-०५ पासून सामायिक प्रवेश परीक्षा (CET) पध्दत अंमलात आणण्याचे निर्देश दिलेले आहेत. मा. सर्वोच्च न्यायालयाचे सदरचे आदेश विचारात घेऊन त्यानुसार राज्यात सर्व अध्यापक महाविद्यालयांची सामायिक प्रवेश परीक्षा प्रक्रिया व प्रवेशासाठी कोटा ठरविण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधिन होता.

(कृपया मागे पहा.)

**शासन निर्णय** : संदर्भाधिन क्र. १ ते ९ येथील शासन निर्णय व पत्रान्वये तयार केलेली सुधारित नियमावली व निरनिराळया सुधारणा व पुरवणी नियमांच्या आधारे सर्व शासकीय/अशासकीय अनुदानित व कायम विना अनुदानित अध्यापक महाविद्यालयातील सन २००४-०५ या वर्षापासून प्रवेश संचालक, उच्च शिक्षण यांच्या स्तरावर केंद्रीभूत प्रवेश पध्दतीने सामायिक प्रवेश परीक्षा घेऊन खालीलप्रमाणे पूर्ण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(१) अध्यापक महाविद्यालयातील प्रवेशासाठी पुढीलप्रमाणे कोटा ठेवण्यात यावा. (शासकीय व अशासकीय अनुदानीत महाविद्यालये वगळून)

(अ) व्यवस्थापन कोटा ... २० टक्के

(व्यवस्थापन कोटा मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्देशाप्रमाणे राज्यस्तरीय सामायिक प्रवेश परीक्षेद्वारे अथवा राज्यातील सर्व व्यावसायिक संस्थांच्या वतीने त्यांच्या असोसिएशनमार्फत घेतलेल्या सामायिक प्रवेश परीक्षेद्वारा भरण्यात यावा.)

(ब) इतर कोटा (केंद्रीभूत पध्दतीने प्रवेश) ... ८० टक्के

(त्यामध्ये ७० टक्के जागा संबंधित विद्यापीठ क्षेत्रातील व ३० टक्के जागा विद्यापीठ क्षेत्राबाहेरील असतील.)

(क) राज्यातील अशासकीय अल्पसंख्यांक अध्यापक महाविद्यालयांत ५० टक्के जागा भाषिक/धार्मिक अल्पसंख्यांक समाजासाठी ठेवण्यात याव्यात. या ५० टक्के जागांपैकी २० टक्के जागा व्यवस्थापन कोटयाचा समावेश राहील. अल्पसंख्यांक संस्थांना व्यवस्थापनाचा स्वतंत्र कोटा राहणार नाही. उर्वरित ५० टक्के जागांपैकी ७० टक्के जागा विद्यापीठ क्षेत्र व ३० टक्के जागा विद्यापीठ क्षेत्राबाहेरील असतील.

२. प्रवेशपरीक्षेसाठी येणारा खर्च संचालक, उच्च शिक्षण यांनी प्रवेश अर्ज व सामायिक प्रवेश परीक्षेसाठी आकारण्यात येणारे शुल्क यातून भागविण्यात यावा. केंद्रीभूत प्रवेश पध्दतीचा कार्यक्रम संचालक, उच्च शिक्षण यांनी तयार करुन प्रवेश अर्जाच्या माहितीपुस्तिकेसह शासनास दरवर्षी पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ. मा. भट्टलवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे सचिव.
अध्यक्ष, प्रवेश नियंत्रण समिती, शासकीय तंत्र निकेतन, ३रा मजला, रु.क्र.३०५, ४९,खेरवाडी, अलियावर जंग मार्ग, खेरवाडी, बांद्रा, पू(५१)
संचालक, पश्चिम क्षेत्रीय कार्यालय, एन.सी.टी.ई., भोपाळ.
कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
कुलसचिव, सर्व विद्यापीठे.

(कृपया पुढे पहा.)

संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय सहसंचालक (उच्च शिक्षण), मुंबई, पुणे, कोल्हापूर, जळगांव, औरंगाबाद, नांदेड, नागपूर, अमरावती.
सर्व जिल्हाधिकारी.
प्राचार्य, सर्व शासकीय/अशासकीय अनुदानित/अशासकीय विना अनुदानित अध्यापक महाविद्यालये (शिक्षण संचालक, उच्च शिक्षण यांच्यामार्फत).
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा परीक्षा) , महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
अधिदान व लेखाकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक.
वित्त विभाग/ सामान्य प्रशासन विभाग.
संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
उच्च व तंत्रशिक्षण विभागातील सर्व उपसचिव, अवर सचिव व कार्यासन अधिकारी.
निवड नस्ती / मशि-३.
C:\My Documents\ce३\Gr\B.Ed. CET.doc